अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी मंत्रिमंडळ उपसमितीची पुनर्रचना.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक: मुस-२०००/१४/प्र.क्र.२०/२०००/३५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ फेब्रुवारी, २००५.

पहा :- १) शासन निर्णय, क्रमांक:मुसएमएन-२०००/सीआर-२०/२०००/३५, दि.१.४.२००० व समक्रमांक दि.२० ऑक्टोबर, २००१ चे शुध्दीपत्रक.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाची दि.४ फेब्रुवारी, २००० पासून पुनःस्थापना करण्यात आली होती. सदर आयोगास दि.४.२.२००५ पासून पुढील एका वर्षासाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोल्लेखित दि.१.४.२००० च्या शासन निर्णयान्वये अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी ठोस उपाय सूचविण्यासाठी तत्कालीन मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमितीची स्थापना करण्यात आली होती. आता सदरहू मंत्रिमंडळ उपसमितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) श्री.विलासराव देशमुख | मा.मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २) श्री.आर.आर. पाटील | मा.उपमुख्यमंत्री | सदस्य |
| ३) श्री.हाजी अनीस मजीद अहमद | मा.मंत्री,पशुसंवर्धन,दुग्धविकास, मत्स्यव्यवसाय व औकाफ | सदस्य |
| ४) श्री.सतीश झाऊलाल चतुर्वेदी | मा.मंत्री, वस्त्रोद्योग, माजी सैनिकांचे कल्याण व रोजगार व स्वयंरोजगार | सदस्य |
| ५) श्री.नवाब मलिक | मा.मंत्री, कामगार | सदस्य |
| ६) श्री.सिध्दराम सातलिंगअप्पा म्हेत्रे | मा.राज्यमंत्री, गृह, तुरुंग व फलोत्पादन | सदस्य |
| ७) श्री.हसन मुश्रीफ | मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण, पशुसंवर्धन, दुग्धविकास, मत्स्यव्यवसाय, औकाफ व विधी व न्याय | सदस्य |
| ८) श्री.बाबा सिद्दीकी | मा.राज्यमंत्री, कामगार,अन्न व नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण व अन्न व औषधे प्रशासन | सदस्य |
| ९) संबंधित अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव | सामान्य प्रशासन विभाग | पदसिध्द सदस्य सचिव |

वरील उपसमिती खालील विषयांवर विचार करील.

१) सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय क्षेत्रांमध्ये अल्पसंख्याकांना सहभागी करून घेण्यासाठी खास प्रयत्न करणे,
२) केंद्र शासनाच्या १५ कलमी कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी मुख्यमंत्र्यांच्या देखरेखीखाली स्वतंत्र विभाग स्थापन करणे,
३) अल्पसंख्याकांच्या जीवित, मालमत्ता व धार्मिक स्थळांची संपूर्ण संरक्षणाची जबाबदारी घेणे,
४) उर्दू शाळांची मागणी प्राधान्याने पूर्ण करणे व उर्दू शिक्षकांची रिक्त पदे ताबडतोब भरणे,
५) उर्दू भाषेला प्रोत्साहन देण्यासाठी संरक्षण देणे,

६) औकाफच्या बळकावलेल्या जमिनी मूळ विश्वस्तांकडे परत करणे,

७) राज्यातील अल्पसंख्याक समूहामध्ये गेलेला विश्वास पुन्हा निर्माण करण्यासाठी प्रयत्न करणे,

८) अल्पसंख्याकांच्या शैक्षणिक संस्थांसाठी आयोग स्थापन करणे,

९) अल्पसंख्याकांच्या तांत्रिक संस्था स्थापन करून राष्ट्रीय अल्पसंख्याक विकास महामंडळ व राज्यस्तरीय महामंडळामार्फत थेट आर्थिक मदत करणे,

१०) अल्पसंख्याकांमध्ये व विशेषतः स्त्रियांमध्ये साक्षरता आणि शिक्षण यांच्या प्रसारासाठी आर्थिक मदत वाढविणे,

११) जातीय दंग्यांबाबतचे खटले चालविण्यासाठी विशेष न्यायालये स्थापन करणे,

१२) नोकर भरतीमध्ये प्रतिनिधीत्वासाठी प्रशिक्षण देणे,

१३) इतर संबंधित विषय.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शांतीप्रकाश गो. ठाकूर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा.मुख्य सचिव,
६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. सामान्य प्रशासन विभाग/का.२५ व २६,
१३. वित्त विभाग/व्यय-४, सेवा-५,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व मंत्रालयीन विभाग,
१७.* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी),
१९. कक्ष अधिकारी, माहिती व तंत्रज्ञान कक्ष, मंत्रालय, मुंबई (२ प्रती वेबसाईट साठी)
२०.* समितीचे सर्व सदस्य.
२१. निवड नस्ती.

* पत्राने.